इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक कार्यालय, अमरावती या कार्यालयातील “वरिष्ठ निरिक्षक” संवर्गातील रिक्त पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२५२४/प्र.क्र.३९/प्रशा-३ (१४-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९ ऑगस्ट, २०२४.

वाचा : १) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि. १७-१२-२०१६.
२) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि. ३१-०८-२०१७.
३) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि. १६-०२-२०१८
४) या विभागाचे समक्रमांकाचे दि. २८-०२-२०२४ रोजीचे पत्र/जाहिरात.

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. १६-०२-२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतच्या धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती संदर्भाधीन क्र. २ येथील दि. ३१-०८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. २८-०२-२०२४ रोजीच्या पत्रान्वये इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात आली होती. त्यानुसार मंत्रालयीन विभागाकडून प्राप्त इच्छुकतेमधून श्री. प्रदीप काशीराम खडसे, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग यांची इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक कार्यालय, अमरावती या कार्यालयातील “वरिष्ठ निरिक्षक” संवर्गातील रिक्त पदावर ३ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील पदनाम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. प्रदीप काशिराम खडसे, सहायक कक्ष अधिकारी | नगर विकास विभाग | इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक कार्यालय, अमरावती | वरिष्ठ निरिक्षक |

२. उपरोक्त नमूद कर्मचाऱ्याची त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयात खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) उपरोक्त कर्मचारी ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करेल, त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने

शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) संबंधित अधिकाऱ्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन नगर विकास विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत इतर मागास व बहुजन कल्याण विभाग/आस्था-२ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. उपरोक्त कर्मचाऱ्याच्या बाबतीत नगर विकास विभाग हा त्यांचा प्रशासकीय विभाग असल्यामुळे त्यांच्या प्रशासकीय बाबी नगर विकास विभाग व इतर मागास व बहुजन कल्याण विभाग/आस्था-२ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०९१६३०२१९५०७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.09 16:44:50 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.प्रदीप काशिराम खडसे, सहायक कक्ष अधिकारी (नगर विकास विभागामार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. अ.मु.स./प्र.स./सचिव, इतर मागास व बहुजन कल्याण विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. सहसचिव/उप सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्याच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक कार्यालय, अमरावती या कार्यालयास उपलब्ध करून देताना त्या संबंधीच्या अटी व शर्ती संदर्भात त्यांनी इतर मागास व बहुजन कल्याण विभाग २-आस्था/यांच्याशी संपर्क करावा. तसेच अटी व शर्ती ठरविल्यानंतर म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा...इ.) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मध्ये नमुद केलेल्या अटी व शर्ती नमूद करूनच प्रतिनियुक्तीचे आदेश काढणे आवश्यक आहे. त्यानुसार काढलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तात्काळ पाठविण्यात यावी.
४. सहसचिव/उपसचिव (आस्था२-), इतर मागास व बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्याच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी संबंधित विभागाकडे पाठपुरावा करावा.
५. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, अमरावती.
६. सा.प्र.वि./प्रशा-३(१४-अ) (संग्रहार्थ)